सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत- अपंगत्व प्राप्त जवान लॉन्स हवलदार रामेश्वर पुंडलिक दासपुते जि. जालना.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१७/ प्र. क्र. २ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १२.०१.२०१७.

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२०००.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/प्रस्ताव/सैकवि-१६, दि. १५.१२.२०१६.

**शासन निर्णय**

संदर्भाधीन दिनांक ०४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशांतर्गत भागात निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत/ चकमकीत/अंतर्गत सुरक्षा मोहिमे अंतर्गत धारातीर्थी पडलेल्या, सैन्यदलातील, महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रु.५.०० लक्ष याप्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्यात यावी तर अपंगत्व प्राप्त जवानांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणानुसार रु.१.०० लक्ष व रु.३.०० लक्ष इतकी आर्थिक मदत अनुज्ञेय आहे.

त्यानुसार सैनिक कल्याण विभागाने दिनांक १५.१२.२०१६ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार अपंगत्व प्राप्त महाराष्ट्र राज्यातील जवानांस आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**अपंगत्व प्राप्त जवान (रुपये** १.०० लक्ष व रु.३.०० लक्ष **प्रमाणे एक वेळेची आर्थिक मदत)**

| अ. क्र. | नाव व पत्ता | अपंगत्व प्राप्त दिनांक, मोहिम व ठिकाण | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | १५५७३७३० एच लॉन्स हवलदार **रामेश्वर पुंडलिक दासपुते** मु. भायडी, पो. दानापूर, ता. भोकरदन, जि. जालना | २१ ऑक्टोंबर, २०१५ जम्मु काश्मिर मधील बारामुल्ला येथे ऑपरेशन रक्षक मोहिमेअंतर्गत कार्यरत असतांना आतंकवाद्यांनी केलेल्या गोळीबारात जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झाले. | १.०० लक्ष |
| | | **एकूण** | **रुपये १.०० /- लक्ष** |

२. अपंगत्व प्राप्त जवानांना रु. १,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) इतकी अर्थिक मदत प्रदान करण्यात येत असून या रु. १,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) रक्कमेपैकी ४० % म्हणजे रु. ४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ६० % रक्कम म्हणजे रु. ६०,०००/- (रुपये साठ हजार फक्त) मुख्यमंत्री सहायता ( कारगिल ) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत ऑक्टोंबर, २०१६ पर्यंत गुंतविण्यात आलेल्या रु. ४२,२१,७२,०००/- कोटी रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा खर्च रुपये ४०,०००/- (रुपये चाळीस हजार फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त जवानांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर रक्कम रु. ४०,००,०००/- (रुपये चाळीस लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जालना यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन दिनांक ४.१०.२००० मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११६१५५८३४४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.01.16 16:04:13 +05'30'

**(कि. म. जकाते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, जालना,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जालना, सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,

९. १५५७३७३० एच लॉन्स हवलदार **रामेश्वर पुंडलिक दासपुते,** मु. भायडी, पो. दानापूर, ता. भोकरदन, जि. जालना .

११. निवड नस्ती (२ प्रती).